सन २०२०-२१ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत- वन शेती उप अभियानाच्या रु.३३५.०२ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देणे व सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.६६.६१ लक्ष निधी वितरीत करणे.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः वनशेती-०७२०/ प्र.क्र.८९/१४-अे**

मादाम कामा मार्ग, हुमात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई- ४०० ०३२

तारीख: २० ऑगस्ट, २०२०.

**संदर्भ:**

१. कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र. शाशेअ-२०१७/प्र.क्र.१२६/४अे, दि.८ डिसेंबर, २०१७.
२. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१-३/२०२०, NRM-SMAF (FTS-८४०३०) दि.२३ जून, २०२०.
३. कृषि व शेतकरी कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.१-३/२०२०-NRM-SMAF, दि. २ जुलै, २०२०.
४. संचालक फलोत्पादन यांचे पत्र क्र.जा.क्र.कृ.आ.फलो/फलो-२/वनशेती/१६२८३/१९, दि.१० जुलै, २०२०.

**प्रस्तावना:**

सन २०१७-१८ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत वनशेती उप अभियान राबविण्यात येत आहे. यामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याच्या निधीचे प्रमाण ६०:४० असे आहे. सदर उप अभियान राज्यात राबविण्यासाठी संदर्भाधीन दि.८ डिसेंबर, २०१७ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. २ जुलै, २०२० च्या पत्रान्वये, सन २०२०-२१ या वर्षासाठी एकूण रु.३३५.०२ लक्ष निधीच्या कार्यक्रमास मान्यता दिली असून यामध्ये केंद्र हिस्सा रु.२०१ लक्ष व राज्य हिस्सा रु.१३४.०२ लक्ष आहे. त्याचप्रमाणे, केंद्र शासनाने संदर्भाधीन दि.२३ जून, २०२० रोजीच्या पत्रान्वये पहिल्या हप्त्याचा रु.१६० लक्ष निधी वितरीत केला आहे. यामध्ये सर्वसाधारण प्रवर्गाचा रु.१२६ लक्ष, अनुसूचित जाती प्रवर्गाचा रु.१८.८८ लक्ष व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा रु.१५.०४ लक्ष निधीचा समावेश आहे. त्यानुसार रु.३३५.०२ लक्ष निधीच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देवून सर्वसाधारण प्रवर्गाचा केंद्र हिश्श्याचा रु.४० लक्ष व त्यास आवश्यक समरुप राज्य हिश्श्याचा रु.२६.६१ लक्ष असा एकूण रु.६६.६१ लक्ष निधी आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

१. सन २०२०-२१ मध्ये केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत- वन शेती उप अभियानाच्या अंमलबजावणीसाठी केंद्र हिश्श्याच्या रु.२०१ लक्ष निधी (रुपये दोन कोटी एक लाख फक्त) आणि राज्य हिश्श्याच्या रु.१३४.०२ लक्ष निधी (रु.एक कोटी चौतीस लाख दोन हजार फक्त) असा एकूण रु.३३५.०२ लक्ष निधीच्या (रुपये तीन कोटी पस्तीस लाख दोन हजार फक्त) कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्यात येत असून त्यात समावेश आहे.

२. उक्त प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन सदर कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ करिता सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र हिस्सा रु.४० लक्ष (रुपये चाळीस लक्ष फक्त) व समरुप राज्य हिस्सा रु.२६.६१ लक्ष (रुपये सव्वीस एकसष्ट हजार फक्त) असा एकूण रु.६६.६१ लक्ष निधी (रुपये सहासष्ट लाख एकसष्ट हजार फक्त) आयुक्त (कृषि) यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BDS) वितरीत करण्यात येत आहे.

३. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला निधी योजनेच्या पुढील लेखाशीर्षखाली सन २०२०-२१ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा.

| केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा |
|---|---|
| मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९- विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>(०१)(५६) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उप अभियान (कें.पु.यो.)<br>(केंद्र हिस्सा-६०%) (२४०१ ए ८२४)<br>३३ अर्थसहाय्य. | मागणी क्रमांक-डी-३<br>२४०१-पीक संवर्धन,<br>१०९- विस्तार व शेतकरी प्रशिक्षण<br>(०१)(५७) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान-वनशेती उप अभियान (कें.पु.यो.)<br>(केंद्र हिस्सा-६०%) (२४०१ ए ८३३)<br>३३ अर्थसहाय्य. |

४. अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाचा निधी स्वतंत्रपणे वितरीत करण्यात येईल.

५. सदर निधी केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि.२ जुलै, २०२० रोजीच्या पत्रान्वये मंजूर केलेल्या बाबींवरच खर्च करावा.

६. सदर निधी लाभार्थ्यांना PFMS प्रणालीद्वारे त्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर वितरीत होत असल्याची खातरजमा आयुक्त, कृषि यांनी करावी.

७. सदर निधी खर्च करताना केंद्र शासनाच्या उप अभियानाच्या मार्गदर्शक सूचना, संदर्भाधीन दि.८ डिसेंबर, २०१७ चा शासन निर्णय, केंद्र शासनाच्या दि.२ जुलै, २०२० च्या पत्रातील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर निधी खर्च विहीत कार्यपद्धती अनुसरुन, सर्व वित्तीय कायदे/नियमांचे/प्रकियेचे पालन करून व वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अंमलबजावणी यंत्रणानी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठल्याही शासन निर्णयाची वा परिपत्रकाचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील.

९. सदर निधीचे जिल्हा निहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी आयुक्त (कृषि) यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. निधीचे आहरण व संवितरण करणेसाठी विविध स्तरावरील अधिकाऱ्यांना पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण अधिकारी** |
|---|---|---|---|
| १. | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे | सहायक संचालक (लेखा-१) कृषि, आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. |
| २. | जिल्हास्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी. | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी. |

१०.सदर कार्यक्रमाची क्षेत्रीय स्तरावर अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने संचालक (फलोत्पादन) यांनी सविस्तर सूचना निर्गमित कराव्यात.

११.सदर शासन निर्णय वित्त विभागाने दि.३.८.२०२० त्यांचा अनौ.संदर्भ क्र.१३४/१०२०/व्यय-१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१२.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२०१४५२१९९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shrikant Chandrakant Andge

Digitally signed by Shrikant Chandrakant Andge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5d5ab93b4e4f2fcd87e12fe19b8965025d482b1bee0fffaa62085c34db6bfd8c, serialNumber=d8d9626c9e038380cd235c048f20d7ce74cffd3a95f2ac3c192e9c991f358271, cn=Shrikant Chandrakant Andge
Date: 2020.08.20 14:58:29 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री ( कृषि), मंत्रालय, मुंबई-३२
२. सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरु, कृषि विद्यापीठे (सर्व)
४. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, पुणे
५. सर्व सन्मानीय विधिमंडळ सदस्य द्वारा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. सर्व संचालक/सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१

७. विभागीय कृषि सह संचालक (सर्व)
८. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, जिल्हा परिषद
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर/(लेखा परिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता)
१०.महालेखाकार (स्थानिक) निकाय लेखापरिक्षा व लेखा प्रतिष्ठा भवन, १०२ महर्षी कर्वे मार्ग, मुंबई-४०००२०.
११.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.नियोजन विभाग (का-१४३१) मंत्रालय, मुंबई-३२
१३.वित्त विभाग ( व्यय-१ व अर्थसंकल्प - १३) मंत्रालय, मुंबई-३२
१४.मा.राज्यमंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१५.मा.मंत्री ( कृषि ) यांचे खाजगी सचिव
१६.निवड नस्ती (कार्यासन -१४अे).